राज्य व्यवस्थापन कक्ष-रुरबन करिता प्रादेशिक कार्यालय प्रमुख घोषित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांक :** रुरबन-२०१८/प्र.क्र. १५४ /योजना-१

बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड

फोर्ट, मुंबई-४०० ००१

दिनांक: २७ डिसेंबर, २०१८

**वाचा -**

१) शासन निर्णय, ग्रा.वि.वि. एनआरएम २०१६/ प्र.क्र.०१/योजना-४, दि. १४ जानेवारी, २०१६.

२) शासन निर्णय, ग्रा.वि.वि. एनआरएम २०१६/प्र.क्र.१२/योजना-४, दि. ६ जुलै, २०१७.

३) शासन निर्णय, ग्रा.वि.वि. रुरबन २०१८/प्र.क्र.१३३/योजना-१, दि.१२ सप्टेंबर, २०१७.

४) शासन निर्णय, ग्रा.वि.वि. रुरबन २०१८/प्र.क्र.१०३/योजना-१, दि.१९ नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना -**

ग्रामीण व शहरी भागातील विकासाचा असमतोल दुर करणे , यामध्ये प्रामुख्याने आर्थिक व तांत्रिक सोयी सुविधा ग्रामीण भागामध्ये उपलब्ध करुन देणे , याअनुषंगाने राज्यामध्ये केंद्र शासन पुरस्कृत राष्ट्रीय रुरबन अभियान (National Rurban Mission-NRuM) सन २०१५-१६ या आर्थिक वर्षापासून शासन निर्णय, ग्रा. वि. वि. एनआरएम २०१६/प्र.क्र.०१/योजना-४, दि. १४ जानेवारी , २०१६ अन्वये सुरु करण्यात आलेले आहे . सदर अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणीकरीता केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनानुसार राज्यस्तरावर राज्य व्यवस्थापन कक्ष-रुरबन ची निर्मीती करण्यात आली आहे.

राज्य व्यवस्थापन कक्ष-रुरबन करीता प्रादेशिक कार्यालय प्रमुख घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय -**

राज्य व्यवस्थापन कक्ष-रुरबन करिता शासन निर्णय , ग्रा.वि.वि. रुरबन २०१८/प्र.क्र.१३३/योजना-१, दि.१२ सप्टेंबर, २०१७ अन्वये राज्य समन्वयक (प्रतिनियुक्तीने) उप मुख्य कार्यकारी अधिकारी या संवर्गातील अधिकारी हे पद निर्माण करण्यात आलेले आहे . या अनुषंगाने उप मुख्य कार्यकारी अधिकारी -रुरबन यांना प्रादेशिक कार्यालय प्रमुख घोषित करण्यात येत आहे.

२. शासन निर्णय क्रमांक वित्त विभाग विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५ मधील भाग पहिला, उप विभाग एक मधील अनुक्रमांक १, नियम क्र.२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर शासन निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे .

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२७११३६४२१९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr. Vasant Gopal Mane

Digitally signed by Dr. Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19c1f05a32104713094b1babbae721a60140a8f1f9e16ca9d8dc3eaf7de15d65, cn=Dr. Vasant Gopal Mane
Date: 2018.12.27 16:01:43 +05'30'

डॉ. वसंत माने
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. मा. मंत्री (ग्रामविकास) यांचे स्वीय सहाय्यक.
४. मा. राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे स्वीय सहाय्यक.
५. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव.
६. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, नियोजन/वित्त/सामाजिक न्याय/आदिवासी विकास/गृहनिर्माण विभाग.
७. महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच प्रतींसह).
८. महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर (पाच प्रतींसह)